





**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk14.gad-mh@gov.in

........................................................................................................................

**क्र. : असप्र १२२४/प्र.क्र१०६/प्रशा-१.** **दि.१६.०८.२०२४**

प्रति,

सह सचिव /उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय : राज्य मराठी विकास संस्था, मुंबई या संस्थेतील प्रशासकीय अधिकारी हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता अवर सचिव संवर्गातून इच्छुकता मागविण्याबाबत.**

महोदय /महोदया,

उपरोक्त विषयाच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, मराठी भाषा विभागाच्या अधिपत्याखालील राज्य मराठी विकास संस्था, मुंबई या कार्यालयातील 'प्रशासकीय अधिकारी ' हे पद मंत्रालयीन **अवर सचिव** संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे.

२. त्यानुषंगाने आपल्या विभागातील सर्व अवर सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांना सदर प्रतिनियुक्तीबाबत अवगत करावे. सदर प्रतिनियुक्तीसाठी इच्छुक अधिकाऱ्यांचे मागील ५ वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह वैयक्तिक माहिती, संपूर्ण सेवा तपशील, ना-विभागीय चौकशी प्रमाणपत्र, विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इ. माहिती सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये नमूद केल्यानुसार या विभागाकडे दि.३०.०८.२०२४ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होईल अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच या प्रतिनियुक्तीस कोणी अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही या विभागास कळविण्यात यावे, ही विनंती.

३. तसेच, उपरोक्त पदासाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या अवर सचिवांनी परस्पर या विभागाकडे अर्ज करू नयेत. त्यांनी आपआपल्या विभागास अर्ज सादर करावेत. परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जाचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितास काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

४. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२४०८१६१११३३५६३०७ हा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आले आहे.

**आपला,**

**सोबत: विवरणपत्र.**

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.16 11:28:20 +05'30'

**( ग. स.परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत : निवडनस्ती प्रशा-१.**

# विवरणपत्र

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | स्थायित्व प्रमाणपत्र | |
| ५ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या (साक्षांकित प्रतीसह) छायाप्रती) मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ७ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? (दि.३१.०३.२०२४ अखेरचे) | |
| ८ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | |
| १० | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| ११ | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १२ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे? | |